# संस्कृताध्ययन
## लेखांक 1

बुधकौशिक ऋषींबद्दल फारशी कोणाला माहिती नाही पण त्यांनी लिहिलेला मंत्र अजरामर आहे, जो रामरक्षा म्हणून आपल्या सर्वांनाच माहित आहे. असे म्हणतात की ऋषींना भगवान शंकरांनी हे स्तोत्र स्वप्नात सांगितले जे त्यांनी सकाळी उठल्यावर लिहून काढले. (रामरक्षा 15)

संस्कृत मध्ये अनुष्टुभ (स्तुन्भ धातू) म्हणजे गुणगान करणे, प्रशंसा करणे.

अनुष्टुप् छंदात मंत्र लिहिता लिहिता बुधकौशिक ऋषींनी संस्कृतचे व्याकरण सुद्धा सांगण्याचा प्रयत्न केला आहे. जसे रामरक्षेतील 37 वा श्लोक. ह्या श्लोकाची आपण विस्ताराने माहिती करून घेऊ.

रामो राजमणि: सदा विजयते रामं रमेशं भजे ।
रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः ।।
रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोऽस्म्यहम् ।
रामे चित्तलयः सदा भवतु मे भो राम मामुद्धर ।।
रामरक्षा 37।।

रामः राजमणि

रम् धातू रमणे ह्या पासून तयार झालेले राम हे प्रातिपदिक.

रम्+अ=राम

रामः राम अकारान्त पु. प्र. ए. व.

अशा पद्धतीने 13 स्वरांची (अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, ऋ, दीर्घ ऋ, लृ) प्रातिपदिके तयार होतात.

राजमणि हा सामासिक शब्द राम नामाचे विशेषण म्हणून वापरले आहे. ह्या समासाचे

विश्लेषण करण्यापूर्वी समासाचे प्रकार जाणून घेऊ.

1. तत्पुरुष समास - दोन शब्दांनी तयार झालेला ह्या समासातील उत्तर पद अर्थाच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. जसे देवालय देवस्य आलयः, ह्यातील आलय हा शब्द महत्त्वाचा.

ह्याचे दोन प्रकार आहेत

अ) कर्मधारय समास हा मुख्यत्वे विशेष्य विशेषणापासून बनतो.

ब) द्विगुसमास ह्याचे पूर्वपद संख्यावाचक असते. उदा. त्रिलोकी त्रयाणां लोकानां समाहाराः

2. द्वन्द्वः

3. बहुव्रीहीः

4. अव्ययभावः

राजमणि राजसु मणिः राजांमधील श्रेष्ठ, हे रामासाठी विशेषण वापरले आहे.

संस्कृत भाषेतील नियमाप्रमाणे जे व्याकरण विभक्ती विशेष्याचे तेच व्याकरण विभक्ती विशेषणाचे. त्याचे सूत्र खालीलप्रमाणे.

यल्लिङ्गं यद्वचनं या च विभक्तिः विशेष्यस्य |
तल्लिङ्गं तद्वचनं सा च विभक्तिः विशेषणस्यापि।।

मागील लेखात आपण प्रत्ययांविषयी जाणून घेतले.

आता आपण उपसर्ग म्हणजे काय ते समजावून घेऊ.

संस्कृत मधे एकूण उपसर्ग 20 आहेत. "प्रादयः उपसर्गाः क्रियायोगे ।अष्टाध्यायी

प्रादयः (1.4.58)

उपसर्गाः क्रियायोगे (1.4.59).

काहिजण ते 22 आहेत असे मानतात. जसे अति, अधि, अनु, अप, अपि, अभि, अव

आङ्ः, उत्, उप, दुर्, नि, निर्, परा, परि, प्र, प्रति, वि, सम्, सु.

उपसर्गासंबंधी दोन श्लोक प्रसिद्ध आहेत.

"धात्वर्थं बाधते कश्चित् कश्चित् तमनुवर्तते ।

विनिशिष्टि तमेवार्थमुपसर्गगतिस्त्रिधा ।।१।।

उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते ।

प्रहाराहार-संहार-विहार-परिहारवत् ।।२।।"

आ+ हारः = भोजन

सम् + हारः = समाप्त होणे

वि + हारः = विहार करणे

परि+हारः=निर्णय घेणे

प्र+हारः =हल्ला करणे

नुसत्या उपसर्गांचा वाक्यात काहीच उपयोग नसतो. मात्र जेव्हा हे उपसर्ग धातूंच्या आधी जोडले जातात, तेव्हा त्यांना अर्थ प्राप्त होतो. अशा उपसर्गांमुळे धातूंचे गुणकार्य होते. जसे

1. धातू ला नवीन अर्थ प्राप्त करून देणे.

2. मूळ धातू च्या अर्थाची व्याप्ती वाढवणे.

3. काही अकर्मक धातू, सकर्मक होतात

4. काही परस्मैपदी धातू आत्मनेपदी होतात आणि काही आत्मनेपदी धातू परस्मैपदी होतात

5. एकापेक्षा जास्त उपसर्ग लावून नवीन शब्द तयार होतात जसे वि+आ+करण =व्याकरण सम्+आ+लोचन =समालोचन

आता परत मूळ श्लोकाचा अभ्यास करू.

रामो राजमणि सदा विजयते

रामः राम अकारान्त पु. प्र. ए. व.

राजमणि राजषु राजस् सकारान्त पु. स. ए. व.

मणिः मणि इकारान्त पु. प्र. ए. व.

विजयते वि+जि जयति धातू उत्कर्ष होणे. कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आपल्याला क्रियापदांचे तीन काळ माहीत आहेत. त्यांचे संस्कृत भाषेतील विवेचन पुढील प्रमाणे.

लट् वर्तमाने लेट् वेदे भूते लुङ् लङ् लिटस्तथा ।
विध्याशिषोर्लिङ्लोटौ च लुट् लृट् लृङ् च
भविष्यति ॥

अष्टाध्यायी सूत्राप्रमाणे सर्व धातूंचे 10 गणांत विश्लेषण केल्यानंतर त्यापुढे या धातूंचे परस्मैपदी आणि आत्मनेपदी असे वर्गीकरण केले आहे.

आत्मने आत्मन् पु. च. ए. व.

ज्याला द्यायचे त्याची चतुर्थी हा व्याकरण विभक्ती चा नियम आपल्याला माहीत आहेच. त्या उक्तीनुसार स्वतः साठी जी क्रिया केली जाते ते धातू आत्मनेपदी.

परस्मैपदी म्हणजे दुसऱ्यासाठी केलेली क्रिया.

परस्मै पर सर्वनाम  पु. प्र. ए. व.

आता दुसऱ्या वाक्याचाअर्थ समजावून घेऊ.

रामं रमेशं भजे।

रामम् राम अकारान्त पु. द्वि. ए. व.

रमेश ह्याचा संधीविच्छेद

रमा+ईश

र्+अ+म्+आ+ई+श्+अ असा होतो.

येथे 2 स्वर आ आणि ई ह्यांची संधी झाली आहे.

भजे भज् धातू प्रार्थना करणे सन्मान करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी उ. पु. ए. व.

भजे हे उत्तम पुरूषातील रूप असल्याने अहम् म्हणजे मी हे अध्यारूत आहे.

रमा म्हणजे लक्ष्मी. तिचा ईश म्हणजे लक्ष्मीपती.

आता आपण संधी विषयी जाणून घेऊ. दोन लगतच्या वर्णांचे संयोजन किंवा एकीकरण केले असता जो बदल दिसून येतो त्याला संधी असे म्हणतात.

आपल्या वर्णमालेत 13 स्वर आणि 33 व्यंजने दिसून येतात. त्यांच्या परस्पर संयोजनानुसार संधीच्या प्रकारांचे वर्गीकरण केले आहे.

सुरुवातीला आपण स्वरसंधींचे प्रकार पाहू. स्वर संधींचे 8 प्रकार आहेत. ते खालीलप्रमाणे

1. सवर्णदीर्घ यामध्ये एकाच र्हस्व आणि दीर्घ स्वरांचे संयोजन झालेले दिसून येते.

अ+अ=आ परम+अर्थः=परमार्थः

आ+आ=आ विद्या+आलय=विद्यालय

इ+इ=ई कवि+इन्द्र =कवींन्द्र

ई+ई=ई मही+ईशः=महीशः

उ+उ=ऊ भानु+उदय=भानूदय

ऊ +ऊ=ऊ

वधू+ऊत्साहः =वधूत्साहः

ऋ+ऋ=ऋ (दीर्घ) पितृ+ऋणम् =**पितृणम्**

2. गुण संधी जेव्हा अ आणि आ ह्या स्वरांचे इतर स्वरांशी संयोजन होते तेव्हा नवीन रूप तयार होते त्याला गुणसंधी असे म्हणतात.

अ/आ +इ / ई=ए देव+इन्द्र=देवेन्द्र

अ/आ +उ /ऊ =ओ

सूर्य +उदयः=सूर्योदयः

अ/आ +ऋ /ऋ =अर्थ सप्त+ऋषयः=सप्तर्षयः

अ/आ +लृ =अल्

तव+लृकारः=तवल्कारः

अशा प्रकारे गुणसंधी 8 आणि सवर्णदीर्घसंधी 16 दिसून येतात.

संहिता हा शब्द सम्-उपसर्गपूर्वक धा-धातूला क्त-प्रत्यय लागून बनलेला आहे. व्युत्पत्तीनुसार या शब्दाचा अर्थ 'एकत्र ठेवणे' असा होतो.

महर्षी पाणिनींनी अष्टाध्यायीमध्ये संहितेचे लक्षण केले आहे -'परः संनिकर्षः संहिता।' . वर्णांमधील आत्यंतिक सांनिध्य म्हणजे संहिता होय. संहिता ही बंधनकारक असते तर विराम वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून असतो.

यासंबंधीची कारिका पुढीलप्रमाणे –

संहितैकपदे नित्या नित्या धातूपसर्गयोः।
नित्या समासे वाक्ये तु सा विवक्षामपेक्षते।।.
संहिता एक पदे नित्या नित्या धातू उपसर्गयोः।
नित्या समासे वाक्ये तु सा विवक्षाम अपेक्षते ।।
एक पद, धातू आणि उपसर्ग तसेच समास यांमध्ये संहिता नित्य मानलेली आहे. तर वाक्यामध्ये पदांचा जोडून उच्चार करणे अथवा न

करणे हे विवक्षेवर म्हणजे वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे.

1. जेव्हा एखाद्या वाक्यात एखादे पद हे अक्षरांच्या संयोगानेच निर्माण होते जसे किम्+चित्=किञ्चित् (नपु), कः+चित् =कश्चित् (पु) त्यावेळेस संहिता अपरिहार्य असते.

2. धातूला, उपसर्ग जोडला असता धातू मध्ये गुणप्रक्रिया घडते हे आपण आधीच्या लेखात वाचले, येथे सुद्धा संहिता अपरिहार्य असते.

3. याचप्रमाणे दोन पूरक शब्द एकत्र आले असता जे नवीन शब्द तयार होतात त्यांना समास असे म्हणतात. येथे सुद्धा संहिता अपरिहार्य असते.

4. आता राहिला 4था प्रकार विवक्षा म्हणजे वक्तुम इच्छा, वच् धातू बोलणे तुमुन प्रत्यय. संधी वाचण्याची इच्छा असलेला. वाक्य बोलत

असताना संधीसकट म्हणायचे की विराम घेऊन, हे विवक्षेवर अवलंबून असते.

वर्णांमध्ये संहिता असल्यास संधिकार्य होतेच. त्यामुळे बालेन (बाल + इन), क्षीरौदनः (क्षीर + ओदनः), परीक्षते (परि + ईक्षते) येथे संहिता बंधनकारक असल्याने विशिष्ट संधिनियमही प्रवृत्त झालेले आहेत.

रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नमः।।

रामेणाभिहता रामेण + अभिहता सवर्ण दीर्घ संधी

रामेण रामाकडून राम पु. तृ. ए. व.

देव शब्दाचे विभक्ती रूप पाहिले असता त्याचे तृ ए. व. देवेन असे होते मग राम चे तृ ए. व.  रामेन असे का नाही झाले.

त्यासंबंधी नियम अष्टाध्यायी च्या 8.4.1 ह्या सूत्रात सांगितले आहेत.

रषाभ्यां नो णः समानपदे' एकाच शब्दात (समानपदे) ऋ, र किंवा ष यांच्या पुढे आलेल्या शब्दांतल्या' न' चा 'ण' करावा.

केव्हा? त्यासाठीचा नियम - अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि (पाणिनी 8.4.2).

ऋ, र, ष आणि 'न' यांच्यामध्ये अट् (अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ऋ, दीर्घ ऋ, लृ हे स्वर, अनुस्वार, विसर्ग, आणि हयवर ही अक्षरे) वा, कुपु (क आणि प वर्गांतली व्यंजने) आली तरी 'न' चा 'ण' करावा.

उदाहरणार्थ प्रतिष्ठान मध्ये 'ष्' आणि' न' यांच्यामध्ये 'ठ' आला आहे. 'ठ' हा 'क' किंवा 'प' वर्गातला नाही. त्यामुळे 'न' चा 'ण' होत नाही. जो वर्ण न ला ण होऊ देत नाही त्याला

व्यवधायक असे म्हणतात. आणि जे बाधा आणत नाहीत त्यांना अव्यवधायक असे म्हणतात. क वर्ग प र वर्ग ह य व र हे वर्ण अव्यवधायक आहेत

रामेण

र्+आ+म्+ए+(न्) ण्+अ

येथे रा आणि न मध्ये म आला आहे (प वर्गीय)

अभिहता मारले गेले अभि+हन् धातू मारणे कृत् क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

निशाचरचमू

निशाचर रात्री फिरणारे

निशायां चरति

निशाचराणां चमूः रात्री फिरणाऱ्यांचा समूह

ह्या वाक्याचा थोडक्यात अर्थ असा की

रामाकरवी रात्री संचार करणाऱ्या (दैत्यांचा) संहार घडवून आणला गेला आहे.

हे वाक्य कर्मणि प्रयोग दर्शवते.

हेच कर्तरि प्रयोगात असे लिहिता येईल.

रामः निशाचरचमूणां अभिहतवान।

रामाय तस्मै नमः

रामाय राम पु. च. ए. व.

तस्मै त्याला तद् पु. च. ए. व.

नमः नमस्कार असू दे

नमस् अव्यय (क्रियापदाचे काम करते, गरज पडल्यास विभक्ती रूपे लिहीता येतात)

रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोऽस्म्यहम् ।

रामान्नास्ति रामात् न अस्ति (येथे त् चा न झाल्याने सवर्णदीर्घसंधी होऊन न+न+अ=न्ना असे रूप होते

रामात् रामापेक्षा राम पु. पं. ए. व.

न अव्यय

अस्ति अस् धातू अदादि गण कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

परायणं अन्तिम लक्ष्य पर+अयनं

अयनं इ धातू जाणे ल्युट प्रत्यय, भाववाचक शब्द तयार होतो.

परतरं श्रेष्ठ पर ह्या शब्दाला 'तर' हा प्रत्यय जोडला आहे.

दोन वस्तूंतील सरसनीरसता श्रेष्ठकनिष्ठपणा उच्चनीचपणा अशी तुलना करायची असल्यास 'तर' प्रत्यय लागतो.

रामस्य रामाचा राम पु. ष. ए. व.

दासोऽस्म्यहम्

दासः अस्मि अहम्

दास्+अ+ : +अ +स्+म+इ

येथे विसर्गाचा लोप होऊन ' उ' झाला. त्यामधे विसर्गाआधीचा अ जोडला गेल्याने त्याचा 'ओ' होतो. आणि विसर्गानंतर च्या ' अ' चा लोप झाला. त्या ऐवजी अवग्रह चिन्ह 'ऽ' वापरतात. मात्र तसा नियम नाही. कारण काही वेळा, गोंधळ होण्याची शक्यता असते.

म्हणून दासोऽस्मि,

दासोस्मि असे लिहिले तरी चालते.

लोप म्हणजे काय?

अदर्शनम् लोपः

लोप 3 प्रकारचे आहेत.

1. विसर्गापूर्वी 'अ' आणि विसर्गानंतर 'अ' आल्यास विसर्गाचा 'उ' होता. विसर्गापूर्वीचा 'अ' व विसर्गाचा 'उ' यांचा गुणसंधिनियमानुसार 'ओ' होतो. पुढील 'अ' चा लोप होतो. लोप झालेल्या 'अ' च्या जागी अवग्रह (ऽ) चिन्ह वापरतात.

2. विसर्गापूर्वी 'आ' व नंतर कोणताही स्वर अथवा मृदुव्यंजन आल्यास विसर्गाचा लोप होता.

बालिकाः + अपि = बालिका अपि

3. एषः' व 'सः' यांच्या पुढे 'अ' शिवाय कोणताही वर्ण (स्वर किंवा व्यंजन) आल्यास

विसर्गाचा लोप होतो. त्यांचा पुन्हा स्वरसंधी होत नाही.

एषः + कविः = एष कविः

सः + उच्यते = स उच्यते

दासोऽस्म्यहम् ह्या शब्दाचा

दासः अस्मि ही संधी आपण शिकलो. आता उत्तरपदातील संधी पाहू.

अस्मि अहम् =स्म्यहम् ह्या  संधी चा अभ्यास करूया

येथे इकोयणचि 6.1.77 ह्या सूत्राचा आधार घेता येईल.

इकः यण अचि। हे तिन्ही महेश्वर सूत्रातील निरनिराळे प्रत्याहार (संज्ञा) असून त्याचे सूत्र तयार केले आहे. आधी सांगितल्याप्रमाणे विसर्गाचा लोप होऊन ओ वर्ण तयार झाला.

इकः इक् ष. ए. व.

यण यण प्र. ए. व.

अचि अच् स. ए. व.

इक, यामधे इ, ई, उ, ऊ, ऋ, दीर्घ ऋ, लृ हे वर्ण येतात.

यण यामध्ये य, व, र, ल हे वर्ण आहेत

अच प्रत्याहारात सर्व स्वर आहेत

ह्या सूत्राचा अर्थ असा की

यथा अनुक्रमे इक प्रत्याहार वर्णांचे यण प्रत्याहार वर्णात रूपांतर होते. म्हणून

इ, ई - य

उ, ऊ - व

ऋ ऋ - र

लृ - ल

आता अस्मि अहम् =स्म्यहम् ही संधी सहज समजेल.

स्+म्+इ+अ=स्म्य

अहम् मी अस्मद् सर्वनाम प्र. ए. व.

अस्मि अस् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दासोऽस्म्यहम् ।

ह्या ओळीचा थोडक्यात अर्थ असा की

श्रीरामांपेक्षा अन्य कोणीही श्रेष्ठ नाही. अशा श्रीरामांचा मी दास आहे.

ह्याच अर्थाचा आणखी एक श्लोक.

देहबुद्धध्या त्वदासोऽहं जीवबुद्धध्या त्वदंशकः।

आत्मबुद्धया त्वमेवाहम् इति मे निश्चिता मतिः॥

हनुमान श्रीरामचंद्रांना उद्देशून असे म्हणत आहेत की

भौतिक जगात वावरताना मी तुमचा सेवक आहे. अध्यात्मिक पातळीवर मी जेव्हा स्वतःबद्दल विचार करतो तेव्हा माझ्यात तुमचा अंश आहे हे जाणवते. थोडक्यात मी म्हणजे तुम्हीच आहात असा माझा विश्वास आहे.

रामे चित्तलय: सदा भवतु मे भो राम मामुद्धर ।।

रामे राम पु. स. ए. व.

चित्तलय: चित्तस्य लयः चित्तलय पु. प्र. ए. व.

चित् धातू विचार करणे

लि धातू विलीन करणे

सदा सदैव अव्यय

भवतु होऊ दे भू धातू लोट लकार प्र. पु. ए. व.

मे अस्मद् सर्वनाम ष. ए. व.

भो आदरार्थी संबोधन

राम संबोधन

मामुद्धर माम्+उद्धर

माम् अस्मद् द्वि. ए. व.

उद्धर उत्+धर धृ धातू धारण करणे लोट लकार म. पु. ए. व.

किंवा

उत्+हर हृ धातू हरण करणे लोट लकार म. पु. ए. व.

येथे वाक्यानुसार उद्धर चा अर्थ लावावा लागेल.

विद्वत्तापूर्ण लेखनामध्ये चर्चा केलेल्या विषयाबद्दलच्या परिच्छेद अथवा ओळी पुढे इतर पुर्वासुरींच्या मांडणीचा वाङ्मयसूचीनुसारी सुसंबद्ध निर्देश उद्धृत केला जातो यास उद्धरणे म्हणतात.

पाण्यात असलेल्या क्षारांमुळे सागरजलाची उद्धरण क्षमता  जास्त असते.

आपल्या वाक्यात सदैव रामाचे स्मरण चित्ती असू द्यावे असे म्हटले आहे म्हणजे माझ्या मानसिक आणि बौद्धिक क्षमतेची उंची वाढू दे असा अर्थ घेता येईल.

ह्या वाक्याचा थोडक्यात अर्थ असा की

माझे मन, (चित्त) सदैव रामामधे लीन होऊ दे. हे रामा! माझा उद्धार कर.

---------------- *************** ----------